उच्च व तंत्र शिक्षण विभागातंर्गत येणाऱ्या सर्व शासकीय वसतिगृहांची सुरक्षा तपासणी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- वसति-५३२३/प्र.क्र.११६/मशि-२**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :-२८ जून, २०२३

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. वसति-५३२३/प्र.क्र.११६/मशि-२ दि.७.६.२०२३

२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं-२०२३/वसतीगृह सुरक्षा तपासणी/प्रशा-३/७१९५ दि. १९.६.२०२३

<u>प्रस्तावना</u> :-

दिनांक ६ जून,२०२३ रोजी मुंबई येथील सावित्रीदेवी फुले शासकीय वसतिगृहामध्ये घडलेल्या दूर्देवी घटनेच्या पार्श्वभूमीवर उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितील सर्वच शासकीय वसतिगृहांच्या सुरक्षिततेचा आढावा घेण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य पुणे यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात आली होती. सदर समितीने सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून करावयाच्या उपाययोजनांच्या शिफारशींचा अहवाल शासनास सादर केला. या शिफारशींच्या अनुषंगाने करावयाच्या कार्यवाहीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य पुणे यांच्या अध्यक्षतेखालील समितीने सादर केलेल्या शिफारशी स्विकारण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार राज्यातील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितील सर्व वसतिगृहांमध्ये सुरक्षेच्या दृष्टिकोनातून पुढील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.:-

१. दिनांक ६.६.२०२३ च्या घटनेच्या पार्श्वभूमीवर सर्व शासकीय वसतिगृहातील गृहपाल /अधिक्षक / वार्डन यांचे वसतीगृहातील राहणाऱ्या मुला / मुलींची सुरक्षा व आरोग्य विषयक बाबींबाबत संबंधित विषय तज्ञांमार्फत प्रशिक्षण आयोजित करण्यात यावे. त्यासंदर्भात संचालक उच्च शिक्षण / तंत्र शिक्षण हे मार्गदर्शक सूचना निर्गमित करतील आणि त्यानुसार प्रशिक्षण आयोजित करण्यात यावे.

२. सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या वसतीगृहातील प्रवेशाबाबतच्या नियमावलीत विद्यार्थ्यांची सुरक्षा याबाबीस प्राधान्य देऊन प्रचलित नियमावलीचा आढावा घेऊन आवश्यकतेनुसार त्यात बदल करणे आवश्यक आहे. सदर कार्यवाही या शासन निर्णय मधील अ.क्र. १२ नुसार गठीत समितीने करावी.

३. प्रत्येक वसतीगृहासाठी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून भक्कम सुरक्षा भिंत उभारण्यात यावी. त्याअनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रके तयार करुन घेऊन मान्यतेबाबतची पुढील कार्यवाही संबधित विभागीय सहसंचालक यांनी करावी.

४. वसतीगृह संपूर्ण आवार (बाहेरीलबाजू) व वसतीगृहाच्या व्हरांडयातील परिसर सीसीटीव्ही व अद्ययावत कॅमेरा युक्त असावा. त्याकरीता अ.क्र.१२ नुसार समितीने पाहणी करुन आपला अहवाल संबंधित संचालक उच्च शिक्षण / तंत्र शिक्षण यांना सादर करावा.

५. मुलींसाठी असलेल्या वसतीगृहात प्रशिक्षित महिला सुरक्षारक्षकांची नेमणूक करावी. तसेच विद्यार्थीनीसाठी आवश्यक असणाऱ्या पूरकसेवा (लॉन्ड्री वगैरे) यासाठी निश्चित वेळ ठरविण्यात यावी. तसेच या सेवा महिला पुरवठादारामार्फत पुरविण्यात याव्यात.

६. गृहरक्षक दल व गृह विभागाने प्रमाणित केलेले वा त्यांनी निर्देशित केलेल्या विश्वासार्ह सेवापुरवठादार संस्थाकडून सुरक्षा रक्षकाची सेवा घेण्यात यावी.

७. सदरहू सेवापुरवठादाराव्दारे पुरविण्यात येणारे रक्षक हे वेळोवेळी बदलण्यात यावेत. कोणत्याही परिस्थितीत एकच सुरक्षा रक्षक (व्यक्ती) यांची वारंवार नेमणूक करण्यात येऊ नये, याची दक्षता घेण्यात यावी. याबाबत स्थानिक परिस्थितीनुसार अ.क्र. १२ नुसार गठीत समितीने उपाययोजना करावी.

८. वसतीगृहातील विद्यार्थ्यांनी वसतीगृहामध्ये प्रवेश करणे, बाहेर जाणे याकरीता प्रवेशव्दाराजवळ संगणकीय प्रणालीव्दारे नोंद घेण्यासाठी आवश्यक प्रणाली कार्यान्वित करण्याच्या अनुषंगाने संबंधित संचालक उच्च शिक्षण / तंत्र शिक्षण यांना प्रस्ताव सादर करावा.

९. वसतीगृहातील विद्यार्थ्यांच्या वसतिगृहातील उपस्थितीबाबत पालकांना वेळोवेळी (Periodical) अहवाल मिळेल याद्दष्टीने विभागीय सहसंचालक यांच्या अध्यक्षतेखालील समितीने योग्य त्या उपाययोजना कराव्यात.

१०. प्रत्येक वसतीगृहामध्ये विशाखा समिती, ॲन्टी रॅगिंग समिती, तक्रारपेटी उपलब्ध असणे आवश्यक आहे. तथापि, ज्या वसतीगृहामध्ये उपलब्ध नसतील त्या ठिकाणी समिती स्थापन करावी तसेच तक्रार पेटी बसविण्यात यावी. याशिवाय तातडीने संपर्क करण्यासाठी विशिष्ठ ई-मेल व संपर्क क्रमांक घोषित करुन त्यांची माहिती वसतीगृहाच्या आवारात लावावी.

११. वसतीगृहातील प्रत्येक मजल्यावर आपत्कालीन अलार्म बटन बसविणे आवश्यक असल्याने त्याअनुषंगाने तशी यंत्रणा तयार करण्याची कार्यवाही अ.क्र. १२ नुसार गठीत समितीने उचित प्रस्ताव तयार करावा.

१२. वसतीगृहाच्या सुरक्षेचा निरंतर आढावा घेण्यासाठी वसतीगृह सुरक्षा समिती गठीत करण्यात यावी.

या समितीची रचना पुढीलप्रमाणे असावी.

| | |
|---|---|
| संबधित विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण)/ (तंत्र शिक्षण) | - अध्यक्ष |
| वसतिगृह कार्यक्षेत्रातील पोलीस स्टेशनचे प्रतिनिधी | - सदस्य |
| संबधित विभागातील एक प्राचार्य (महिला) | - सदस्य |
| संबधित विभागातील एक प्राचार्य (पुरुष) | - सदस्य |
| वसतीगृह प्रमुख | - सदस्य सचिव |

सदरहू समिती स्थानिक (संबधित) पोलीस स्टेशनच्या सहाय्याने दरमहा वसतीगृह सुरक्षेचा आढावा घेऊन गरजेनूसार सुरक्षा विषयक उपाययोजना सुचवतील. वसतीगृह प्रमुख यांनी समितीने सुचविलेल्या उपाययोजनानुसार प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक कार्यवाही करावी.

२. वरील प्रमाणे कार्यवाही करुन संबंधित सहसंचालकांनी प्रथम पूर्तता अहवाल एक महिन्यात संचालकांकडे सादर करावा आणि संचालकांनी त्यांचे अभिप्रायासह शासनास सादर करावा. त्यानंतर दर सहा महिन्यांनी संचालकांनी वसतीगृह सुरक्षेचा आढावा घेऊन शासनाकडे अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०६२८१८३६५४७५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.06.28 18:38:09 +05'30'

**(प्रताप पां.लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७) उप सचिव (उच्च शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) उप सचिव (तंत्र शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
११) सर्व विभागयीय सह संचालक, (उच्च शिक्षण)
१२) सर्व विभागीय सह संचालक (तंत्र शिक्षण)
१३) निवडनस्ती